


राज्य मराठी विकास संस्था
(महाराष्ट्रशासन पुरस्कृत)
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय,
३, महापालिका मार्ग,
धोबीतलीव, मुंबई – ४००००१
रजि नं. एक १६०९४ (मुंबई)
दूरध्वनी : २२६५३९६६/ फॅक्स : २२६३११२५
Email rmvs_mumbai@yahoo.com


## निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क्र./ २०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे.

ह्या प्रकल्पांतर्गत उपलब्ध होणारे ग्रंथ व नियतकालिके प्रतिमुद्राधिकार अधिनियमाची मुदत उलटलेले असल्याने सार्वजनिक स्वरूपात उपलब्ध आहेत. ही सामग्री विविध ग्रंथालयांनी जतन करून ठेवल्यामुळेच आज आपल्याला उपलब्ध होत आहे.

सदर पुस्तके अथवा नियतकालिके जशी उपलब्ध होत जातील तसे त्यांचे संगणकीकरण करून जनतेला ती उपलब्ध करून देण्यात येतील. ह्या ग्रंथांच्या/ नियतकालिकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना आपण खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

०१ सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती ह्या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.

०२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.

०३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्थेची मुद्रा आपणास काढता येणार नाही.

०४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी ह्या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून ह्या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. ह्यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था ह्यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

॥ श्री ॥

# काव्येतिहास-संग्रह.

भुजतरुवनच्छायां येषां निषेव्य महौजसां
जलधिरशना मेदिन्यासीदसावकुतोभया ।
स्मृतिमपि न ते यान्ति क्ष्मापा विना यदनुग्रहम्
प्रकृतिमहते कुर्मस्तस्मै नमः कविकर्मणे ॥

राजतरंगिणी.

पुस्तक ३. आक्टोबर, सन १८८०. अंक १०.

हें मासिक पुस्तक

पुणें पेठ बुधवार येथें

भाऊ गोविंद सापकर यांचे ज्ञानचक्षु छापखान्यांत
छापून प्रसिद्ध केलें.

किंमत ८ आणे.

अनुक्रमणिका

## सूचना.

छापखान्याच्या गैर व्यवस्थेमुळें ह्या पुस्तकाचे अंक मागें पडले. परंतु ते सर्व सालाबाद प्रमाणें डिसेंबर सन १८८० च्या आंत निघून वाचकांस मिळतील अशी आम्हीं तजवीज केली आहे. याजकरितां ज्यां कडून वर्गणी येणें आहे त्यांणीं ती खाली प्रमाणें सत्वर पाठवावी अशी विनंती आहे.

का० सं० व्यवस्थापक.

---

## राज्यव्यवहार-कोश.

हें पुस्तक थोड्याच दिवसानीं वर्गणीदारांस व इतरांस मिळेल. उशीर होण्याचे कारण वर लिहिल्या शिवाय दुसरें ह्मणण्यासारखें नाहीं. उशीर होत आहे याबद्दल वर्गणीदार क्षमा करतील अशी आशा आहे.

का० सं० व्यवस्थापक.

अनुक्रमणिका

# विषयक्रम.

बखरी.

शिवछत्रपतींचें चरित्र................७७-८४.

नागपूरकर भोंसल्यांचे कागदपत्र.....२५-३१.

मराठी कविता.

मोरोपंत-कृत प्रश्नोत्तरमाला
व रानापुरस्थ गंगा तीर्थ-
कीर्तन व सन्मनोरथरानि व
विठ्ठलप्रणिधि व काशीस्तुती....६५-८०.

संस्कृतकाव्यें.

प्रभुवंशकाव्यम्..................१-१६.

अनुक्रमणिका

फौजेशीं युद्ध बहुत जाहलें. मोगल नामोहोरम करून हत्ती घोडे पाडाव केले. गनीमाचे वजीर निघोन गेले. ते वक्तीं सिदोजी निंबाळकर पंचहजारी वजीर राजियाचा पडला. पुढें छावणीचे दिवस. फौजा ही निघोन देशास आल्या. राजे पुरंधरास आले.[42] इतकियांत संभाजी राजे राजियाचे पुत्र ज्येष्ठ राजियावर रुसूनें[43] मोंगलाईंत गेले. ते जाऊन दिलेलखानास भेटले. मग त्यांनीं बहुत सन्मान करून चालविलें. पादशहास दिल्लीस दिलेलखानानीं लिहून पाठविलें कीं "राजियाचा पुत्र संभाजी राजा रुसून आपणा जवळ आला आहे. त्यास गौरव करून आह्मीं ठेवून घेतला आहे. तर पातशहानीं मेहरबान होऊन त्यास नांवाजावे ह्मणजे राज्यांत [44]दुई होईल. राज्यांतील लष्कर उठोन आपेंआप येईल आणि किल्ले कोट साधतील" ह्मणून लिहिलें. त्याजवरून पातशहानीं विचार केला कीं राजियाचा पुत्र आला आहे, त्यास नांवाजितां पातशाहींत फितवा करून पातशाही बुडवितील. नांवाजूं नये. हुजूर आणून कैदेंत ठेवावा. ऐसा विचार करून दिलेलखानास लिहून हुकूम पाठविला कीं, संभाजी राजियास घेऊन हुजूर येणें. असें लिहिलें तों अगोदर दिलेलखानाचा वकील पातशहा जवळ होता, त्यानीं हें वर्तमान खानास लिहून पाठविलें. तें वर्तमान खानास कळतांच संभाजी राजियास सुचना करून पळविलें. ते पळून पन्हाळियास आले. हें वर्तमान राजियास पुरंधरास कळतांच संतोष पावून पुत्राचे भेटीस पन्हाळियास आपण आले. मग पिता पुत्रांची भेट जाहली. बहुत रहस्य[45] जाहलें. त्या उपरी राजे ह्मणूं लागले कीं, "लेंकरा मला सोडूं नको. औरंग-

---

४२. "मोंगलाची फौज रणमस्तखान चालोन आला. युद्ध झालें. शिदोजी निंबाळकर राजे यांजकडील, पांच हजार फौज, तीन दिवस युद्ध केलें. रणमस्तखान यासि कैद करून आणिला. त्यासि बुडवावें तों त्याचे कुमकेस केसरसिंग व सरदारखान व बाजेउमराव असे वीस हजार फौज तीन कोसांवर राहिली. मग केसरसिंग याणें अंतरगें सांगून पाठविलें कीं, उभय पक्षीं भाऊपणा आहे. आमची गांठ पडली नाहीं तों वर तुह्मीं कूच करून जाणें. हें वर्तमान कळतांच राजे तेथून निघाले. लष्कर जडगिरी मार्गानें जावें अशी तजवीज केली ते समयीं बहिरजी जासूद याणें कबूल केलें कीं, मोंगलाचा गांठ न पडतां लष्कर घेऊन ठिकाणास जातों. साहेबीं फिकीर न करणें. तीन रात्रीं खपोन रात्रंदिवस अवकाश न करितां पा व (न ?) गड येथें लष्कर घेऊन आला. राजे बहिरजी नायकावर खुशाल झाले. त्याजकडे फाजील होतें तें माफ करून आणखी ही बक्षीस दिलें. तेथून सावकाश लष्कर घेऊन राजे पुरंदरास आले." प्र० प्र०

४३. संभाजीनें एका ब्राह्मणाच्या स्त्रीशीं दुर्वृत्त करण्याचा प्रयत्न केल्यावरून शिवाजीनें त्याची चांगली कानउघाडणी केली, ती संभाजीस रुचली नाहीं.

४४. दुई = दुफळी.

४५. "हर्ष झाला" पाठांतर.

जेव्हाचा आपला दावा. तुजला दगा करावयाचा होता. परंतु श्रीनें कृपा करून सोडून आणिला. थोर कार्य झालें. आतां तूं ज्येष्ठ पुत्र, थोर झालसा आणि सचंतरें[४६] राज्य कर्तव्य हें तुझ्या चित्तीं आहे असें आपणास कळलें, तर मजला हें अगत्य आहे. तरि तुजलाही राज्य एक देतों. आपले पुत्र दोघे जण, एक तूं संभाजी व दुसरा राजाराम. ऐसियास हें सर्व राज्य आहे, यास दोन विभाग करतों. एक चंदीचें राज्य, याची हद्द तुंगभद्रा तहद कावेरी हें एक राज्य आहे. दुसरे तुंगभद्रा आलीकडे गोदावरीनदी पर्यंत एक राज्य आहे. ऐशीं दोन राज्यें आहेत. त्यास तूं वडील पुत्र तुजला कर्नाटकीचें राज्य दिधलें. इकडील राज्य राजारामास देतों. तुह्मी दोघे पुत्र दोन राज्यें करणें. आपण श्रीचें स्मरण करून उत्तर सार्थक करीत बसतों." असें बोलिले. तेव्हां संभाजी राजे बोलिलें कीं–"आपणास साहेबांचे पायांची जोड आहे, आपण दुधभात खाऊन साहेबांचे पायांचें चिंतन करून राहीन" असें उत्तर दिधलें. आणि राजे संतुष्ट जाहले. मग पिता पुत्र बैसून कुल राज्य आपलें देखिलें. कर्नाटक किती आहे व खजीना काय आहे व कारखाने व कारकून मोस्तेसरें[४७] लोक कोणकोण? लष्कर, पागा, शिलेदार किती? सरदार काय काय? गड कोठें? किती? हशम काय? समुद्रांतील जंजिरे, पाणियांतील जाहजें किती? इसमाचा आकार केला. बीतपशील, कारखाने अठरा व महाल मुलूख नाना जिन्नसवार संख्या करणें तो केला. बीतपशील.

### अठरा कारखाने.[४८]

| | | |
|---|---|---|
| १ खजीना. | १ जामदारखाना. | १ पीलखाना. |
| १ जव्हाहीरखाना. | १ जिरातेखाना. | १ फरासखाना. |
| १ आंबारखाना. | १ मुदबखखाना. | १ आबदारखाना. |
| १ शरबतखाना. | १ उष्टरखाना. | १ शिकारखाना. |
| १ तोफखाना. | १ नगारखाना. | १ दारूखाना. |
| १ दफ्तरखाना. | १ तालीमखाना. | १ शहतखाना (?) |

### बारा माहाल.

१ पोतें. १ कोठी. १ पागा. १ थट्टी.

---

४६. सचंतर = स्वतंत्र, निराळें.

४७. "मुत्सदी सर कारकून" पाठांतर. मोस्ते?

४८. कोठे खालीं दिलेल्या पैकीं काहींकां बद्दल हीं नांवें आढळतात 'तालिखाना' 'शिलेखाना' 'खलबतूखाना' 'सराफखाना' 'बंदीखाना.'

| | | | |
|---|---|---|---|
| १ सौदागीर. | १ इमारत. | १ सेरी[50]. | १ टंकसाळ. |
| १ पालखी. | १ वहिली[49]. | १ दरुनी[51]. | १ छबीना. |

**खजीना नाणेंवार व कापड जिन्नसवार बी॥**

| सुवर्ण. | नाणें. |
|---|---|
| १००००० गांदर[52] एक लक्ष. | १००००० सतलाम्या एक लक्ष. |
| २००००० मोहरा दोन लक्ष. | १००००० इभराम्या एक लक्ष. |
| ३००००० पुतळ्या तीन लक्ष. | ४००००० शिवराई होन. |
| १३६४५२५ पातशाही होन. | १५०००००० कावेरी पाला--(पाक?) |
| १२७४६५३ सणगरी[53] होन. | २००००० प्रलखटी होन. |
| २५४०३० अच्युतराई होन. | १००००० पाला(व)नाईकी होन. |
| ३००४५० देवराई होन. | ३००००० आदवणी होन. |
| १००४०० रामचंद्रराई[54] होन. | ५००००० जडमाल होन. |
| १००००० गुती होन. | १४०००० ताडपत्री होन. |
| २००००० धारवाडी होन. | १००००० सांधे सोनें नग कांबीं, |
| ३००००० फलम नाणें वार. | वजन खंडी १२॥ |

**पुरवणी होनाचीं नांवें. (फलम याचे पोटीं).**

| | | |
|---|---|---|
| १ अफरजी. | १ बिलधरी. | १ कटेराई. |
| १ त्रिबोळेरी[55]. | १ उलफकरी. | १ देवजवळी. |
| १ त्रिसुळी. | १ महमदशाई. | १ रामनाथपुरी. |
| १ चंदावरी. | १ वेळुरी. | १ कुनगोटी. |

| रुपये | जडजव्हाहीर. |
|---|---|
| ५००००० रुपये. | १ माणकें. |
| २००००० आसरपद्या. | १ पाच. |
| १०००००० आबाशा. | १ वैडुर्ये. |
| २५०००००० दाभोळी कबरी. | १ नीळ. |
| १०००००० चुली कबरी. | १ पैराज. |

४९. वहिली महाल = रथशाळा.
५०. सेरी = तृप्ति, समाधान.
५१. दरुनी = अंत:पुर.
५२. 'गाहर' किंवा 'गबरे' असेंही होईल.
५३. सणगिरी होन कांहीं प्रतींत दिलेले नाहींत.
५४. '१०४००' पाठांतर.
५५. 'त्रिमळारी' पाठांतर.

९०००० जसरी कबरी. १ मोतीं.
१०००००० रुपें साधें व मीन- १ पोंवळें.
गारी व भांडीं नग वजन खंडी ५०. १ पुष्कराज.
१ हिरे.
——
९

कापड जरी व साधे व रंगाचें व तुमास जिन्नसवार छपन्नदेश व दर्यावरील अजमासें किंमत होन १,००,००,०००. } धान्यसंग्रह रससंग्रह अगणित होता कोठार व देशांत अमर्यादा होती.

————————कलम

एकूण चंद्रमे संख्या २९,००,९००.

९०,००० निशाणी होन. ९,००,००० येळुरी[५६] होन.

**घोडे राऊत संख्या पागा सिलेदार १,०५,००० एक लक्ष पांच हजार.**

**तपशील. पागा ४५,००० यांचे सरदार नांवें.**

| | | |
|---|---|---|
| १ हंबीरराव सरनौबत. | १ निळोजी काटे. | १ आनंदराव हशम हजारी |
| १ संताजी घोरपडे. | १ नेतोजी पालकर.[५७] | १ तेलंगराव |
| १ मानाजी मोरे. | १ तुकोजी निंबाळकर. | १ रुपाजी[५८] भोंसले. |
| १ येसाजी काटकर. | १ गोंदजी जगताप. | १ व्यंकट राऊ खांडकर |
| १ संताजी जगताप. | १ संभाजी हंबीरराव. | १ खंडोजी जगताप. |
| १ निंबोजी[५९] पाटोळे. | १ धनाजी जाधव. | १ उदाजी पवार. |
| १ जेतोजी काटकर. | १ शामाखान. | १ रामजी[६०] कांकडे. |
| १ परसोजी भोसले. | १ रांघोजी[६१] शिरके. | १ कृष्णाजी घाडगे. |
| १ गणोजी शिरके. | १ हरजी[६२] निंबाळकर. | १ सावजी मोहिते. |
| १ बाळोजी काटकर. | १ भवानराव. | |
| —— | —— | —— |
| १० | १० | ९ |

**शिलेदार व मुलखीचे सुभेदार.**

१. नागोजी बल्लाळ. १. जानराव वाघमारे. १. राघो बल्लाळ.

---

५६. ह्या पैक्याच्या यादींत कोठे कोठे फरक पडतो,
५७. 'नथोजी' प्र० प्र०
५८. 'संताजी' पा०
५९. 'बिंबाजी' किंवा 'बुबाजी' पा०
६०. 'दादाजी' पा०.
६१ 'बाबाजी' किंवा 'दादाजी' कांकडे. पा०
६२. 'वाघोजी' पा०
६३. 'मालोजी' पा०

| | | |
|---|---|---|
| १. गणेश शिवदेव. | १. संक्रोजी माने. | १. बळवंतराव देवकाते(ने) |
| १. चंदो हिरदेव. | १. अमरोजी पांढरे. | १. बहिरजी घोरपडे. |
| १. नेमाजी[६४] शिंदे | १. रामाजी जनार्दन. | १. मालोजी[६५] थोरात. |
| १. रामाजी भास्कर. | १. मघोजी थोरात. | १. बाळाजी बहिरव. |
| १. बयाजी[६६] गडदरे. | १. कृष्णाजी भांदडे[६७]. | १. देवाजी उघडे. |
| १. बाळाजी निळकंठ. | १. बहिरजी[६८] वडगरे. | १. गणेश तुकदेव. |
| १. हिरोजी शेलके. | १. चंदो नारायण. | १. केरोजी पवार. |
| १. त्रिंबक विठ्ठल. | १. खेमणी. | १. उचाले. |
| १. महादजी नारायण. | १. खंडोजी आवाळे. | १. नरसोजी शितोळे. |
| १. बाळोजी शिवतरे. | | |
| ११ | १० | १० |

हत्ती व हत्तीणी छावे सुमार १२६०.

पाणियांतील जहाजें आरमाराचे सरदार,
१ दर्यासागर. १ इब्रामखान.
१ मायनाईक.

**हशम मावळे सरदार असामी १,००,००० यांचे सरदार.**

| किता | किता |
|---|---|
| १. येसजी कांक सरनोबत[६९]. | १. दत्ताजी इाडे(तु)लकर. |
| १. सुर्याजी मालसुरे. | १. पिलाजी सणस. |
| १. गणोजी दरेकर. | १. जावजी पाये. |
| १. मुग्बाजी बेनमणा. | १. भिकजी दळवी |
| १. माल सांवत. | १. कोंडजी वडखले. |
| १. विठोजी लाड. | १. त्रिंबकजी प्रभु |
| १. इंद्रोजी गोवडे[७१]. | १. कोंडजी फरजंद |
| १. जावजी महानलाग. | १. तानाजी तुंदुसकरे[७२]. |
| १. नागोजी प्रल्हाद. | १. तानसांवत मावळे. |
| १. पिलाजी गोळे. | १. महादाजी फरजंद. |

६४. 'नेतोजी' पा०
६५. 'मानाजी' पा०
६६. 'रामाजी गडदरे' पा०
६७. 'जावदेव' पा०
६८. 'बहिर्जी मुरग' पा०
६९. 'दरेकर' पा०
७०. 'कवडे' पा०
७१. 'गरवडे' पा०
७२. 'मंदुसरा' पा०

१. मुधोजी सोनदेव.
१. कृष्णजी भास्कर.
१. कलधोंडे[७३].
१. हिरोजी मराठे.
१. रामाजी मोरे.
१. हिरोजी भालदार.
१. तुकोजी कडू.
१. रामदळवी.

१८.

१. येसजी दरेकर.
१. बाळाजीराव दरेकर.
१. सोन दळवे.
१. चांगोजी कडू.
१. कोंडाळकर.
१. ढवळेकर.
१. तानसावत भोसले.

१८.

३६.

गड कोट[७४] जंजिरे व देशांतील जंजिरे गड कोट बी तपशील.

१ कोंढणा उर्फ सिंहगड.
१ घनगड[७५].
१. मसीतवाडे उर्फ मानगड.
१. जयगड.
१. लोहगड.
१. कोटफोंड.
१. कोटलावड.
१. रसालगड.
१. हडसर उर्फ पर्वतगड.
१. कोट केचर.
१. साताराग‍ड.
१. परळीगड उर्फ सज्जनगड.
१. वल्लभगड.
१. जवळेगड.

१. येलबर्गीगड.
१ रांगणा उर्फ प्रसिद्धगड
१. सालेभागड.
१. रोहिडा.
१. मदागिरीगड.
१. जिवधण.
१. कोटमंगळूर.
१. कोपलगड.
१. कोटकुष्टगी.
१. पन्हाळागड.
१. नौबतगड.
१. कोटसुपे.
१. पुरंदरगड.
१. पाली उर्फ सरसगड.
१. अचलागिरीगड.
१. भोरप उर्फ सुधागड.

१. लिंगाणा.
१. चंदन.
१. पांडवगड.
१. वंदन.
१. कोटशिवेश्वर.
१. खिळणा उर्फ विशाळगड.
१. त्रिंबक उर्फ श्रीगड.
१. कोटहालियाळ.
१. बहादुरगड.
१. तानवडा.
१. सालेरीगड.
१. मनोहरगड.
१. अहिवंतगड.
१. ठकरीगड.
१. माहुलीगड.

---

७३. 'कलदंड' पा०

७४. गड = डोंगरी किल्ला. कोट = मैदानांत पाया पासून बांधिलेला. जंजिरा = पाण्यांतील किल्ला.

७५. 'धनगड' पाठांतर.

| | | |
|---|---|---|
| १. हरुषगड. | १. कोटआंकोलें. | १. चाउड उर्फ प्रसन्न गड. |
| १. कुरडु उर्फ मंदरगड. | | |
| १६. | १७. | १६. |

एकूण[७६] ४९.

## नवे राजियांनीं गड वसविले त्यांची नांवनिशीवार सुमारीं सुमार[७७] १११.

| किता. गड. | किता. गड. | किता. गड. |
|---|---|---|
| १. राजगड चारीमाचा. | १. वसंतगड. | १. मयोर गड उर्फ (नवलगुंद.) |
| १. तोरणा उर्फ प्रचंडग. | १. सुंदरगड. | १. पटगड. |
| १. केळजा. | १. महीमानगड. | १. सोनगड. |
| १. वैराटगड. | १. मच्छंद्रगड. | १. कुंजरगड. |
| १. कमलगड. | १. व्यंकटगड. | १. तुंगगड उर्फ कठीण गड. |
| १. वर्धनगड. | १. माणीकगड. | १. महीपदगड. |
| १. प्रतापगड. | १. लोकलगड ( ? ) | १. मदनगड. |
| १. कांगोरी उर्फ मलंगगड. | १. कोथळागड. | १. कांगोरीगड. |
| १. गहनगड. | १. श्रीवर्धनगड. | १. वारुगड. |
| १. पताकागड. | १. कमरगड. | १. भूषणगड. |
| १. पद्मागड. | १. वासोटा उर्फ व्याघ्रगड. | |

७६. यां शिवाय दुसरे प्रतींत नांवें सांपडतात तीं.—केदारकोट, कोरागड, कासेगड, कोळजागड, कनकगड, कोहीमगड, कोठारगड, कंकणीगड, कृष्णागिरीकोट, कुलागड, कैहातकोट, कुडाळकोट, कडवरीगड, कारडीगड, कोचनागड, कल्याणगड, नागिरीगड, नांदागिरीगड उर्फ कल्याण, नळदुर्ग, तरूगड, देवगड, गुणवंतगड, गंधर्वगड उर्फ भुजबळ, ढालगड, चंद्रगड, चतुरगड, चा (र) दी गड, रायगड तक्ताची जागा, रत्नगड, राजहंसगड, राज (न) माची गड, हसुरकोट, हेमाद्रिगड, हंसगड, सुधाकरगड, सुंदरगड, सिंदेदुर्ग जंजीरा, सुगाणागड, सबळगड, सामत्रागड,सिंव्हगड, सज्जनगड, सेरगागड, सुमारगड, येशवंत दूर्ग, व्येंद्रगड, वरूपगड, विंदांविदगड,विश्वासा ईश्वरकोट, शरगागड, शेवळगड, माचणागड, मंगलगड, कांगरी, महीधरगड, महानगड, मानाडगड, मत्तगड, मृगंगड ( पिटकड ? ), महोगड, महीतळीगड, मित्रगड, मकरंदगड, भोरगिरी, भिलवडी, भुजबलगड, भूपाळगड, भद्रगड, प्रचितगड, पराक्रमगड, पाराशरदनाम, पैना (जा) र गड, प्रल्हादगड, पहारगड, बीरकोट, बळराजगड, बाळाकोट.

७७. महाड प्रतींत ८३।८४ च आहेत.

१. सुबकरगड.
१. सबलगड.
१. बहिरवगड उर्फ सारंगा.
१. गगनगड उर्फ बावडा.
१ सारंगगड.
१ सुरगड.
१ जंजिरे विजयदुर्ग.
१ जंजिरे सिंधुदुर्ग.
१ जंजिरे खांदेरी.
१ पावनगड.
१ पारगड.
१ भिंवगड. (भीमगड).
१ भूधरगड.
१ राजगड.
१ सहन(ज)गड.
१ नाकगडगड.
१ लोणजागड.
१ काचणागड.
१ सिदीचागड.
१ वीरगड उर्फ घोसाळा.
१ तिकोना विदगड.
१ जंजिरे सुवर्ण दुर्ग.
१ जंजिरे रत्नागिरी.
१ राजकोट.

३५

१. खोलगड.
१. प्रचितगड.
१. प्रौढगड.
१. वनगड.
१. नरगुंदगड. (महंमद)
१. रामदुर्ग उर्फ भुजबळ.
१ बालेराजा.
१ अंजनवेली.
१ सरगड.
१ मुरगोड.
१ श्रीमंतगड.
१ गजेंद्रगड.
१ कोट येळूर.
१ कनकाद्रिगड.
१ रवळागड.
१ नाचणागड.
१ रामसेनगड.
१ रुद्रमालगड.
१ समानगड.
१ वल्लभगड.
१ महिपालगड.
१ सेवणागड.
१ सेवकगड.
१ कोहजगड.
१ कठोरगड (कोठार).
१ भास्करगड.

३७

१. कोटबोटगीर.
१. कंबल गड.
१. मंगलगड[७८].
१. स्वरूपगड.
१. ढोलागड.
१. मनरंजनगड.
१ बहुलगड.
१ महींद्रगड.
१ रजेगड.
१ बळवंतगड.
१ श्रीगलवडगड.
१ पवित्रगड.
१ कलानिधीगड.
१ गंधर्वगड.
१ सुमनगड.
१ गंभीरगड.
१ मंदरगड.
१ मर्दनगड.
१ दहीगड.
१ मोहनगड.
१ गडागड.
१ कपलगड.
१ हरिश्चंद्रगड.
१ जंजिरे कुलाबा.
१ सिद्धगड.
१ मंडणगड.

३६

एकूण सुमारें १०८*.

७८. 'मनगड' पा०

* वरतीं १११ झटलें आहे परंतु मोजिलें असतां १०८ च भरतात.

नसावें, त्यास आह्मांकडून त्याचे स्नेहांत कांहीं अंतर आहे कीं काय, त्याचें उत्तर झालें पाहिजे. नबाबांनीं मामुल रुपया घेत जाणें ह्मणून तहांत लिहून दिलें असतां त्या प्रमाणें त्यांजकडून घडून आलें कीं काय हे मनास आणून वडीलपणें सांगणें तें सांगावें; अगर मामुल प्रमाणें पैसा वसूल झाला नसला तरी मनास आणून आह्मांस मिळावा येविषयीं आज्ञा करावी. कलम १ जबाब. येविशीं नबाबाशीं बोलून बंदोबस्त केला जाईल. येणें प्रमाणें करार करावे.

१०. सवाल—वऱ्हाडांत[b] अलजपुरीं सुभा असावा; फुटकर जहागीरदारांपाशीं परगणे मात्र असावेत. अलीकडेस बमोजीब[1] फौज त्याचा रहिवास तेथेंच पडला. त्यास जहागीरदार पांच चार हजार फौजेनिशीं राहूं लागले. आणि प्रांतांत उपद्रव करितात; मामुल चालत नाहीं, तेव्हां नागपुरीं फौज दहा हजार नेहमीं असावी. हे प्राप्त, येविशीं काय आज्ञा ते करावी. नबाबा कडून मामुलींत अंतर पडूं नये हें वडीलपणें सांगावें. कलम १ जबाब. येविशीं नबाबाशीं बोलण्यांत येईल. येणें प्रमाणें करार करावे.

११. सवाल—तालुके कडेवळीत येथें देशमुखीचे कामावर आह्मां कडून गुमास्ते पुरातन आहेत. त्यांस त्यांचे तेथील जबानी हकीकत ऐकून व मागील पत्रें आपण पाहून वतनाचा बंदोबस्त आपण करून घ्यावा कब्याचे ठाणें आह्मांकडेस द्यावें हें उचित आहे. सांप्रत वतनावर गुमास्ते हक्क रुस्तम* कानू कायदे घेत आहेत. परंतु दरम्यान पेंच आहेत ते दूर करावे. पेंचामुळें वतन सुरळीत नाहीं. कलम. १ जबाब. इनसाफाचे [अ]रुईनें होईल त्या प्रमाणें अमलांत येईल. येणें प्रमाणें करार करावे.

१२. सवाल—सरकारांतून[c] वकील आह्मां जवळ एक वर्तमान लिहावयास असावा व आह्मां कडीलसरकारांत एक ब्राह्मण राहील. त्यास आपले कडील वकील ऐसा नसावा कीं हातीं बहुमान देणें लागे, व उगाच दरबार भरून मनस्वी राजकारण करीत असावा, असा नसावा. खरें लिहिणार व गरीब असा असावा. अथवा आह्मी बोलूं

---

b. हा सवाल १५ वा आहे.
१. अनुसरून, प्रमाणें.

* देशमुख देशपांडे यांचे हक्क.
अ. चालू वहिवाट. योग्यमार्गें.
c. हा सवाल १६ वा आहे.

तो समागमें द्यावा कीं सदैव आपली ममता यथास्थित राही. आणि संदेह न येई. गृहस्थ पापास भिये ऐसा योजून द्यावा. कलम १ जबाब. सरकारांतून शाहणा मनुष्य देऊं तो, तो तुमचे मर्जी प्रमाणें चालेल. येणें प्रमाणें करार करावे.

१३. सवाल—नबाब आह्मांवर चालून आले तेव्हां जाफेरुद्दवलाचे[2] विद्यनानें भेटींत तह झाला; हें त्याचें एहसान[3] समजून परस्परें भाईचारा आहे हें समजून पत्रें येतात जातात. घरोबा चालतो. येविशीं चित्तांत संशय ठेवूं नये. आह्मी क्रियापूर्वक[4] साथी आपले आहों. कदाचित् मामलतीमुळे अगर कसाही आपले मनांत विक्षेप आला तरी आह्मी मध्यस्थीनें बोलूं; परस्परें बनाऊन देऊं. जर हें उभयपक्षीं न च घडे आणि इरादा शेवटास गेला तरी इरादा सारिखें क्कायतें घडेल. कलम १ जबाब. दिवाकर पुरुषोत्तम यांनीं निर्मलेस जाऊन बाजवी मामुल प्रमाणें स्वराज्याचा सरकारचा अंमल जाफरुद्दवला याचे तालुक्याचा फडशा करावा. बाजवी फडशा झाल्यावर त्याविशीं दुसरा प्रकार नाहीं. त्यानीं सरकार लक्षा प्रमाणें वर्तावें. येणें प्रमाणें करार करावे.

१४. सवाल—मंडळयाच्या[d] राजाचा निर्वंश जाहला. उगेच गोत्र पुरुष एक ह्मणतात आणि आमचे तों मंडलेवाल्याकडे सोळा परगणे थोरले कैलासवासी रावसाहेबांनीं जे समयीं मंडलें घेतलें ते वेळे पासून त्यानीं करारांत अंतर केलें. परगणे आह्मांकडे न दिले. आह्मांवर बंगाल्याची मोहीम दरसाल जाणें व स्वराज्यांत बदनिशी[5] अखण्ड तेव्हां बनेल तसें घेऊन नातें चालवीत गेलों. जेव्हां तिगस्तां फौजे सुद्धां तीर्थरूपांचें जाणें जाहलें तेवेळेस पत्रें व खलीतें वरचेवर पाठविण्यांत आले कीं आषाढ जवळ आला आतां अटकूं नये, हें पत्रें जातां फिरणें जाहलें. फौजेचा पेंच बसला; त्यास मंडल्याचें पारपत्य करून सोळा परगणे आह्मी आपले घेऊन बाकी पैका अगर प-

२. हा निजामाचा वजीर असून 'निर्मळ'चा सुभेदार होता. याचें इस्मायलखान, बाळापुरचा सुभेदार याच्याशीं फार वांकडें होतें. यासच "धौंशा" असें ह्मणतात. याच्या हाताखाली इतिहासप्रसिद्ध माशीरउलमलख कांहीं दिवस वकीलीवर होता. याचें पूर्ण नांव—इब्राहिम बेग जफरुद्दवला साबिहजंग. यानें सन १७७३ मध्यें कुंभारी येथें लढाई झाल्यावर, साबाजीस चांगली मदत केली.

३. कृपा, अनुग्रह.

४. शपथपूर्वक.

*d*. हा सवाल १७ वा आहे.

५. अविश्वास, बे भरंवसा.

रगणे स्वस्थान निमे सरकारांत आणि निमे आह्मांकडे द्यावें हीं आश्वासन पत्रें आपलीं आहेतच. करार झाला आहे. स्वराज्य वलाढ्य व्हावें, हें यांत आहे. कलम १. जबाब. मंडल्याचें राज्य तुह्मीं सोडवावें, त्यां पैकीं तुमचे करारांचे महाल आहेत ते जाउन बाकी महाल राहतील ते खंडोजी भोसल्यांस "सेना बाहादर" किताब देऊन सरकारांतून फौजेस सरंजाम करार करून दिला जाईल. सरंजामाबरहुकूम त्यानीं एकनिष्टपणें सरकारची सेवा करावी. ऐशियाशीं बंगाल्याची मसलत तुह्मी कबूल केली ती आधीं करावी, मग ही मसलत करावी, आधीं या स्वस्थानास गुंतूं नये. येणें प्रमाणें करार करावे.

१५. सवाल—भोपाळवाल्यांनीं हुसंगाबाद शिवनी आज तीस वर्षे देवगड प्रांतांची पुरातन असतां दरम्यान घेऊन राहिला. सरकारांतून ताकीद कैलासवासी नानासाहेब व रावसाहेब यांच्या वरचेवर पाठवीत गेलों. तो ऐकत नाहीं; तेव्हां तंबी[६] करणें हेंच प्राप्त; येविशीं कायतें सांगितलें पाहिजे कलम १ जबाब. सरकाची ताकीद पत्रें द्यावीं वरचेवर ताकीद केली जाईल. येणें प्रमाणें करार करावे.

१६. सवाल—इंग्रजाचा[७] व सरकारचा तह झाला तरी फार उत्तम आहे न होय आणि विघाड ठरला तरी फौजा बंगाल्यास आज्ञे प्रमाणें जातील. त्यास बंगाल्यांत फौज जाणें आणि नागपुरांत फौज राहणें हें संकट आहे; दोनचार हजार फौज राहील थोडकी फौज पाहून कुटुंबा सुद्धां तरी तेथें राहणें त्यास उपद्रव कोणी

---

६. शिक्षा. शासन.

७. इंग्लिश व पेशवे यांचा तह पुढें इ. स. १७८२ च्या मे महिन्याच्या १७ व्या तारिखेस, ग्वाल्हेरी पासून १६ कोसांवर सालबें ह्मणून गांव आहे तेथें झाला. या वेळेस पेशव्यांच्या वतीनें महादाजी सिंदे होते. या तहानें काबीज केलेला मुलूख इंग्लिशांनीं ज्याचा त्यास परत देण्याची कबूलायत केली.

८. या करारा प्रमाणें मुधोजीनें आपला मुलगा चिमणाजी बापू यास सन १७७९ च्या अकटोबर महिन्यांत ३० हजार घोडेस्वार बरोबर देऊन कटक प्रांतीं पाठविलें. मुधोजीची मदत मिळण्या करितां त्यास हेस्टिंग साहेबानें १६ लाख रुपये गुप्तपणें देण्याचें वचन दिलें. तसेंच चिमणाजी स्वसेनेसह नागपुरीं परत गेला असतां १२ लाख रुपये देण्यास गव्हरनर जनरल राजी होता. ५० लाख रुपये घेऊन परत जाण्यास तयार आहें असें चिमणाजीनें उत्तर दिलें. ह्या व दुसऱ्या अटी हेस्टिंग् यानें मान्य केल्या व मुधोजीस मराठे लोकांच्या जूटांतून फोडून काढिलें. ही शकल इंग्लिशांनीं लढविली नसती तर भोंसल्यांचे स्वार सर्व बंगाल प्रांत जमीनदोस्त करून टाकिते. [ग्रांड. पृ. ४४८—५१. तिसरी आवृत्ति.]

कडून होऊं नये याविशीं मदतच होत असावी. दायाद संबंधी व इतर पेंच पडूं नयेत येविशीं खातरजमा आमची असावी आणि येविशींची कळकळ सरकारांत राहत असावी. कलम १ जबाब. किरकोळ उपसर्गास[९] तुमची फौज राहील व सरकारांतूनही मदत होईल. मातबर पेंच पडल्यास मुलें मनुष्यें गाविलीवर[१०] न्यावींत. येणें प्रमाणें करार करावे.

१७. सवाल——परगणे उमरखेड[११] येथें पहिले पासून पांच हजार रुपये ऐन व एक हजार रुपये कारकुनी एकूण सहा हजार रुपये पुरातन पासून घेण्यांत येत होते. दरम्यान सदरहू प्रमाणें ऐवज पावत नाहीं याजकरितां येविशीं कमावीसदारांस ताकीद होऊन सहा हजार रुपये देवविले पाहिजेत. कलम १ जबाब. तीन हजार रुपये दरसाल घेत जावे. माहालास कोणेविशीं तुमचा उपद्रव लागूं नये. येणे प्रमाणें करार करावे.

१८. सवाल——आपण सोळा वर्षांचे होत पर्यंत आह्मी कोणतेही मुलूख अगर महाल मागूं नयेत येविशीं शपथ वाहिली आहे. त्यास आह्मां पासून एकनिष्टेंत रतिमात्र अंतर नाहीं; आह्मी पुरते सरकारचे सोबती ही पक्की खातरजमा जाहली. ऐसें असल्यास संतोषें करून जें उचित असेल तें सरदारीच्या हवाल्यांतून लोभें करून करावें. येणें करून लौकिक सरदारीचा चांगला दिसेल आणि सर्वत्रांस कळे कीं यांणीं निष्टेनें वर्तणुक केली याजकरितां याजवरी सरकारांतून कृपा जाहली हें दिसावें. कलम १ जबाब. येविशीं उचितानुचित तें समजोन उचित केलें जाईल. येणें प्रमाणें करार करावे.

१९. सवाल——चिरंजीव खंडोजी भोंसले जहामर्द बहोष [?] आहेत. फौज कशी व सरदाराची हमेष उमेद राखतात. त्यास आळा होय आणि सरकारच्या व आमच्या उपयोगी पडते याज करितां परभारां त्यांचा कांहीं बंदोबस्त घडत असला, सरकारांतून देण्याचा पेंच नाहीं,

९. उपद्रव, दंगाधोपा.

१०. गाविलगड—हा मजबूद किल्ला ऱ्हाडांत भोंसल्यांचा अंमल असतां त्याजकडे होता. येथें इंग्लिशांशीं लढाई होऊन तो सन १८०३ चे डिसेंबर महिन्याचे १४ व्या तारिखेस इंग्लिशांच्या हातीं गेला. (ड्युक आफ् वेलिंगटन्चें चारित्र. पृ. ५०–५२).

११. हा परगणा निजाम अलीनें नानासाहेब पेशव्याची बायको—गोपिकाबाई इला चोळी खर्चाकरितां ह्मणून इ. स. १७६४ त दिला.

ऐसें असलें तरी विनंती मान्य करावी. कलम १ जबाब. जवामर्द सरकार उपयोगी हें जाणून मंडल्याचे सरंजामाचा आलाहिदा करार करून दिला आहे. येणें प्रमाणें करार करावे. एकूण एकुणीस कलमें सदरहू प्रमाणें करार करून दिले असेत, येणें प्रमाणें करार करावे. चंद्र ११ माहे रमजान सु॥सुमानीन मया[तै]न व अल्लफ. भाद्रपद मास मुक्काम गारपीर. पुण्यावर स्वारी गेली तेवेळेस तह ठरला.

[ १२ ] ॥ श्री ॥

कलंमबदी श्रीमंत सौभाग्यवती दुर्याबाई[1] साहेब सन १२५६ फसली.

१. अव्वल. प्रांत:काळीं उठून शौच मुखमार्जन स्नान करून सोंवळें नेसावें. देवाची व ब्राह्मणाची व तुळशीची पुजा वगैरे पुराणश्रवण इत्यादिक चार घटका दिवस पर्यंत उरकावें. व सोंवळें सोडून पोषाखी लुगडें नेसावें, व जवाहिर व कुंकूं लावावें. नंतर[2] सहावे घटकेत न्याहारी करून बसून तांबूल भक्षावा. फक्त.

२. दुसरें, बाद न्याहारीचे आंतचे चवकाची खबर घेलाविणें, जे चवकांत भीड[3] आहे अथवा नाहीं. भीड असल्यास जामदारखान्याचे[4] जिन्यानीं मुदबाखखान्यांत[5] जाऊन समाचार घेऊन आजीबाई[6] साहेबाचे पायां पडावें. बाद आजीबाई साहेबांस फुरसत असल्यास घटकाभर आजीबाई साहेबांजवळ बसून मुदबाखखान्याची मागती खबर घेऊन सरकारची[7] बातमी ठेवावी. जलदीनें सरकारचें स्नान जाल्यास नीटच

---

१. दुर्याबाई -ही नागपुरचे तिसऱ्या रघोजींची सहावी बायको होय. ही शिरक्यांचे घराण्यांतील. हिचें लग्न सन १८४२ चे सुमारानंतर झालें असावें. राजाचे मरण समयीं ही अल्पवयस्कच होती. हिला कांहीं अपत्य झालें नाहीं. ही सन १८७६ त आश्विन वद्य १४ स प्रात:काळीं प्रहर दीड प्रहर दिवसास निवर्तली. हिला ४५ हजारांचें वार्षिक पेनशन होतें.

२. नंतर, उपरांत—पुढल्या शब्दाशीं संबंध.

३. गर्दी, दाटी.

४. पोषाखांचा कारखाना. पूर्वीचा राजवाडा फार विस्तीर्ण होता. त्यांत बारीक सारीक चौक सोडून टोलेजंग असे दहा चौक होते. या मोठ्या चौकांपैकीं जामदारखान्याकडे एक चौक होता. राजघराण्यांतील बहुतेक व्यक्तींचे निरनिराळे कारखाने असत परंतु सदरीं निर्दिष्ट 'जामदारखाना' सरकारा मोठा जो होता तो असावा.

५. स्वयंपाकगृह व त्या संबंधी कारखाना. "अथ पाकालयं मुदबख्खानेति परिभाषितं" रा० व्य० को०.

६. बाकाबाई—दुसऱ्या रघोजीची बायको व तिसऱ्या रघोजीची आजी. ही १८५८ चे बरसातींत मरण पावली. तेव्हां तिचें वय ७५ वर्षांचें असावें.

७. यजमान—तिसरे रघोजी. हे स्वत: विषयीं कांहीं बोलणें असल्यास प्रथम पुरुषीं सर्वनामाचा उपयोग न करितां 'सरकार' या पदाचा व्यवहार करीत असें ऐकिवांत आहे.

आहे, उशीर असल्यास चवकाचे बिन्यानीं वर्ती येऊन कांहीं क्रमणा करावी. फक्त.

३. बाद सरकारचें स्नान जालें ह्मणजे मुदबाखखान्यांत जाऊन सरकाचें ताट वाढण्याची तजवीज चांगली ठेवावी. सरकार भोजन झालें ह्मणजे सौभाग्यवती अन्नपूर्णाबाई साहेबांकडे यावें. भोजनाचा समेट असल्यास खालीं भोजन करून वर्ती यावें, अगर कांहीं उशीर असल्यास वर्ती येऊन सौभाग्यवती साहेबांचें भोजनाची खबर ठेवून भोजनास जावें. भोजन करून वर्ती येऊन चार घटका आराम करावा. फक्त.

४. आराम केल्यानंतर चूळ भरून बाहेरचे सोप्यांत पाळण्याजवळ[८a] बसून तांबूल भक्षावा. फक्त.

५. नंतर सायंकाळीं मुदबाखखान्यांत जाऊन भोजनाची तजवीज ठेवावी. बाद सरकारचें भोजन जाल्यास वर्ती यावें; नंतर सरकार मुदबाखखान्याचें ताट बोलावून भोजन वर्ती करावें. आपणास भोजनाची जी चीज पसंत असल्यास पेंडे वगैरे हजरच आहेत त्यांचे हातून तयार करवून भोजनाचे वेळेस भक्षावें, व आठ चार दिवसावानीं, चांगली चीज झाली असें भासल्यास, मुदबाखखान्यांत पांड्यांस, समागमें घेऊन सरकार ताटांत वाढवावी. फक्त.

६. आजीबाई साहेबांचे समोर विडा खाऊं नये. व तस्तांत चूळ भरूं नये व पीकदाणी ठेवणें इत्यादि त्यांचे नजरे समोर करूं नये व मर्यादेनें बसून बोलणें चालणें करावें. अगर आजीबाई साहेब वर्ती असल्यास त्यांचे समोर तकिये लावून बसूं नये, तकिये उचलून नजरेचे पलीकडे ठेवावे, ज्या मध्यें आजीबाई साहेबांस दिसेना. फक्त.

७. सौभाग्यवती अन्नपूर्णाबाई साहेब यांचे समक्ष तस्तांत चूळ भरून आचमन न करावें व पिकदाणींत थुंकू नये, हात वगैरे धुणें असल्यास जोत्यावर बसून धुवावे विडा मात्र भक्षावा, अगर वर्ती असल्यास,

---

८. ही राजाची तिसरी बायको. ही मोहित्यांच्या घराण्यांतील. हिजपेक्षां वडील बायका मैनाबाई, व गंगाबाई ह्या निवर्तल्या असल्यामुळें हीच घरांतील मुख्य मानकरीण. याच करितां प्रस्तुत लेखांत तिचा नामनिर्देश केला आहे. हा राजाच्या मरणानंतर सुमारें दोन वर्षांनीं ह्मणजे १८५५ त वारली.

८a. झोपाळा, चौफळा.

९. मुदबाखखान्यावरील मुख्य कामगार. हा जातीचा शूद्र.

आपले सकिय भोंसले[९a] बारीदारे[९b] वगैरे यांचे हातीं बाई साहेबास द्यावें भरताजा, मर्वे द्यावी. फक्त.

८. पाक-निष्पत्ति दोन चार दिवसांत फुरसत करून पांडे व रमाबाई[१०] उभयतांस घेऊन आपले जातीनें करीत जावी, अगर बिघडेल तर चिंता नाहीं. परंतु पाक दोन चार दिवसांनीं करीत जावा, व आळस करूं नये. व जो पदार्थ सरकारास अथवा आपणास जो आवडेल तो आपले जातीनें पांडे उभयतांस घेऊन तयार करावा. व पांडे उभयतांनीं शिकवावें. फक्त.

९. बाहेरच्या बायका सोयरे मंडळी वगैरे आपले येथें आल्यास ज्याचा जसा त्या रीतीनें सन्मान करून विडे देऊन रुकसत[११] करावें. फक्त.

१०. जोनीबाई व धुमेनेबाई वगैरे आदी करून आपले भेटीस आल्यास, उत्तम प्रकारें दस्तुर[१२a] माफक बसवून चांगलें भाषण करून विडे देऊन रुकसत करावें. ते येतील तेव्हां 'बसा' ह्मणण्याची वाट पाहतील त्यास तुरंत[१३] आपण त्यांचे बसण्याचे पूर्वीं 'बसा' असा हुकूम करून सदरहू लिहिल्या प्रमाणें त्यानीं आज्ञा पुसल्यास विडे बोलावून रुकसत करावें. फक्त.

११. हलके माणसाशीं कानांशीं लागून गोष्ट हरवख्त सांगूं नये. एखादी बारकीची गोष्ट असल्यासच कोणी चांगला मनुष्य अथवा स्त्री पाहून त्याचे कानीं गोष्ट सांगून कामाची निकाशी[१४] करावी. फक्त.

१२. जे सरकार सूक्त अथवा असूक्त बाईसाहेबांस व तावेदार लोकांस आज्ञा फर्मावितील त्या आज्ञेनुरूप वर्तणूक करावी. या आज्ञेत खलेल[१५] दिसून आल्यास जबाब देहीं[१६] घेण्यांत येईल. फक्त.

१३. मायबापाशीं व तत्संबंधी सोयरे वगैरे मंडळीशीं सरोकार[१७] ठेवूं नये, व तावेदार लोकांनीं या हुकमावर ख्याल करूं नये. आपले खास अथवा

---

९a. हे कडवे भोंसले–ह्मणजे राज घराण्यांतील पुरुषांचे पोटचे परंतु उपस्त्रियांपासून झालेले. हे हुजरे वगैरेचे कामावर असत.

९b. बारी = पाळी. दार = वाला. पाळी पाळानें राहणारे हुजरे.

१०. दर्याबाईचे खिदमतींतील मुख्य कुणबीण.

११. जाण्यास परवानगी द्यावी, निरोप द्यावा.

१२ या राजाच्या नाटक शाळेपैकीं दोघी, त्या एकंदर आठ होत्या.

१२a. रीतिबर हुकूम; सांप्रदाया प्रमाणें.

१३. त्वरादर्शी, लवकर.

१४. फोड, सफाई.

१५. अंतर, कंपेशी.

१६. खुद्द, स्वत:

१७. दाट संबंध.

दौलत प्रकरणीं तावेदार कोणाचाही असल्यास कामदार अथवा जाम-दार सरकार इतल्ला[18] करून जी कांहीं विनंती करतील ते मुनासबे[19] समजून मान्य करण्यांत येईल. परंतु याचा इतल्ला सरकारास होत असावा. व सणतिवार[20] आहे याजमध्यें तत्संबंधी मातुल पक्ष सोयरे वगैरे मंडळी येतील अथवा बोलावण्याचें काम पडल्यास बोलवण्यास जातील त्यास दस्तुरामाफक रुकसत करून द्यावेत. भोजनास अथवा विड्यास चवघांचे समक्ष रुकसत करावें. फक्त.

१४. मातुल पक्षाची बिलकुल फिकीर ठेवूं नये. सणतिवार भोजनास अथवा विड्यास या प्रसंगास आल्यास, भोजनास बोलवावें अगर विडे द्यावे बाकीची विनंती त्यास करणें असेल ती परभारें सरकारास करतील, व त्याची फिकर सरकार ठेवितील. बाईसाहेबाशीं बिलकुल संबंध नसावा. फक्त.

१५. कामदार व रांडापोरें वगैरे यांशीं हुकूम करतील कीं आमचे तत्-संबंधी मातुल पक्षाचे सोयरे आहेत त्यास कोणचीही चीज भाजी विड्याचे पाना पासून नेऊन देणें—हा हुकूम करूं नये. अगर हुकूम केल्यास तावेदारांनीं ख्याल न ठेवावा, व, त्याचा निरोप बाईसाहेबा जवळ सांगूं नये. फक्त.

१६. मसलतीची गोष्ट असल्यास स्वतःसरकार अथवा मुत्सदी हे काम-दार असल्यास हळूच सांगावी. ज्या मध्यें दुसऱ्यास ऐकूं न जावें बाकी खुलाशाची गोष्ट असल्यास चौघांचे समक्ष व मोठ्यानें बोलल्यास चिंता नाहीं. फक्त.

१७. आपणास सूक्त अथवा असूक्त खबर जाहल्यास तुरंत सरकारास जाहिर करावी.पोषीदगी[21] ठेवूं नये व सरकाराशीं बिलकुल लिहाज[22] करूं नये,किंवा,सरकारानीं पुसल्यास पाहिली किंवा ऐकिली, तें बराबर सांगून द्यावी. फक्त.

१८. हालकीं माणसें बारेकरणी व बारीदार वगैरे यांच्या तोंडीं बिलकूल लागूं नये. आपला बोज[23] हलका पडतो. दाबांतच ठेवणे नीट आहे. चाकरी बराबर घेत जावी. चुकल्यास सजा मुनासब जाणून करावी. फक्त.

---

१८. सूचना.
१९. योग्य.
२०. तीथवार; धर्म संबंधाचा उत्सव.
२१. गुप्त. लपवून.
२२. छद्मीपणा (?) कपटभाव.
२३. वजन.

शिष्या पीयूषाहुनि[22] फार सदुपदेशभाषणें सारें[23] ॥ २४ ॥
गुरुतेचें मूळ मला स्वामी कांहीं च ठाउकें नाहीं ॥
शिष्या न मागणें हें गौरवें[24]--बीज स्वमानसीं पाहीं ॥ २५ ॥
देवा हें ही सांगा त्रैलोक्यामाजि काय हो गहन ॥
बापा चरित स्त्रीचें नेणति विधि-शक्र-गुरू-शशी-दहन ॥ २६ ॥
चतुर ह्मणावें कवणा स्वामी सांगा पुरी स्पृहीं[25] माजी ॥
बारे स्त्रीचरितें जो न खंडिला तो कृती[26] जनामाजी ॥२७ ॥
दारिद्र्य कोण सांगा बहु पुसतों कीं तुह्मां नसे रोष ॥
शिष्या बरवें पुशिलें दरिद्रपण तें चि जो असंतोष ॥ २८ ॥
लघुता कोण स्वामी पुसतों हें संशयाब्धिसेतू तें ॥
यांचा लघुत्व कारण हें कैसें ठाउकें नसें तूतें ॥ २९ ॥
जीवित तें कोण वदा भक्त भ्रमराचिया सदरविंदा[27] ॥
वत्सा तें चि जिणें रे ज्याची जाली नसे जगीं निंदा ॥ ३० ॥
ज्याड्य कशास ह्मणावें हें सांगाजी मला सुदासास ॥
शिष्या जो कौशल्य प्राप्तीसाठीं नसे चि अभ्यास ॥३१॥
जागर कोण स्वामी पुरवाया दास काम[28] हा भागा ॥
जागर मुख्य विवेक चि पुस तूं भीतोसि कां महाभागा ॥ ३२ ॥
स्वामी हें हि कळों द्या निद्रा ती कोणती कसी आहे ॥
शिष्या जे जंतूला मोहुनियां काय मूढता राहे ॥ ३३ ॥
कमळदळस्थजळकणा सम चंचल कोण तो पदार्थ गुरो ॥
बा गा यौवन आयू द्रव्य चपळ बोध हा मनांत उरो ॥३४॥
शारद[29]शशिकिरणासम आल्हादक कोण सांग गुरुवर्या ॥
शिष्या ऐसे सज्जन ज्यांची हरिती त्रितापें[30] परिचर्या[31] ॥ ३५ ॥
स्वामी कोण सुदुःसह सर्वां नरकांपरीस ही नरक ॥
परवशता चि निरय[32] हें जाणुनि तूं संग सोडुनी सरक ॥३६॥
गुरुजी मज उपदेशा जगत्रयीं कोणतें अखंड सुख ॥
शिष्या कळेल तुज तें विषयीं होशील जधवां विमुख ॥३७॥
स्वामी सत्य* पदार्थ ज्ञानसुखें करूनि मी असे रहित ॥

---

२२ अमृताहून. २३ सार. २४ मोठेपणाचें बीज २५ इच्छा. २६ चतुर. २७उत्तम कमला. २८ इच्छा. २९ शरदृतूंतील. ३० आधिदैविक, अध्यात्मिक, व आधिभौतिक हे तीन ताप; उदाहरणें:—वीज आंगावर पडणें आधिदैविक, रोग शरीरीं होणें हा आध्यात्मिक; व पाण्यांत बुडणें हा आधिभौतिक. ३१ सेवा. ३२ नरक. * 'साध्य' पाठांतर.

शिष्या तरि तूं कररे तनुवचनमनें करूनि भूतहित ॥३८॥
स्वामी जे जे प्राणी त्यांचें प्रिय वस्तु मुख्य तें काय ॥
शिष्या पंच प्राण चि लोकांचा प्रिय पदार्थ समुदाय ॥३९॥
स्वामी हें ही सांगा दानांत श्लाध्य कोणतें दान ॥
साधो जें फल–वांञ्छा–वर्जित तें दान ह्मणति सज्ञान ॥४०॥
मित्र कवण हें सांगा संशय न तुह्मां विना दुजा छेदी ॥
तो मित्र होय बापा पापाचारांत जो बुडों नेदी ॥ ४१ ॥
कोण अलंकार गुरो सांगाया योग्य तूं चि होशील ॥
शिष्या जरि हें पुससी तरि भूषण मुख्य आपुलें शील[३३] ॥४२॥
गुरुराया वाचेचें मंडण जें तें असो मला विदित ॥
वाग्भूषण सत्य चि हें शिष्या जाणूनि नित्य हो मुदित[३४] ॥४३॥
ज्याचें अनर्थ फळ तें काय श्रीगुरुवरें निवेदावें ॥
शिष्या विषया पासुनि न निवारित चित्त तें असो ठावें ॥४४॥
स्वामी गुरो दयाब्धे सर्वांला कोणती सदा सुखदा ॥
शिष्या सज्जनमैत्री जीणें स्तवितात्ति सर्व लोक पदा ॥४५॥
सर्वां ही व्यसनांच्या[३५] नाशीं देवा समर्थ कोण बरें ॥
अखिल–व्यसन–ध्वांत[३६]–द्युमणि[३७] त्याग चि मनांत जाण खरें ॥४६॥
*स्वामी अंध ह्मणावा कोण छात्रा अकार्यरत होतो ॥
कोण बधिर गुरुवर्या हित वचनातें न आयके जो तो ॥ ४७ ॥
स्वामी मूक–पदार्थ–श्रवणीं श्रवणासि लागली भूक ॥
वत्सा समयीं नेणे प्रिय बोलायासि तो खरा मूक ॥ ४८ ॥
गुरुजी मरण कवण हें सांगुनि मजला निवृत्ति द्या विपुला ॥
बाळा मुर्खत्व चि रे निधन[३८] महा तें नसो नसो रिपुला ॥ ४९ ॥
स्वामी मोल जयाला नाहीं लोकीं असें असे काय ॥
शिष्या समयीं दिधलें अमूल्य चुंबी तृणासि नररायें[३९] ॥ ५० ॥
शल्य असे कोण गुरो मरणा पर्यंत ज्या मुळें ताप ॥
तें शल्य नेत्र झांकुनि केलें असतें सुगुप्त जें पाप ॥ ५१ ॥
यत्न करावा कोठें हें सांगाजी तुह्मी महा ज्ञानी ॥
शिष्या यत्न करावा विद्याभ्यासीं सदौषधीं दानीं ॥ ५२ ।

३३ स्वभाव. ३४ आनंदित. ३५ संकट. ३६ अंधार. ३७ सूर्य. ३८ मरण. ३९ राजा. * "अंध ह्मणावें कोणा अविचारें जो अकार्यरत होतो" पाठांतर.

अवहेळणा करावी कोठें तीचीं वदा गुरो स्थानें ॥
खळ परभार्या परधन निंदावीं विहित सय्यदा स्थानें ॥ ५३ ॥
रात्रि दिवस चिंतावी कोण गुरुवरा स्वदासविश्रमदा ॥
कुशलें संसाराची ध्यावी निःसारता चि न प्रमदां[40] ॥ ५४ ॥
कोण प्रिया करावी स्वामी करुणामृत द्रवद्दधृदया[41] ॥
वत्सा प्रिया करावी सन्मैत्री दक्षता तसीच दया ॥ ५५ ॥
कंठींहि प्राण जरी आले तरि ही अहो गुरो कवणा ॥
आत्मार्पण न करावें हें सांगा जी मला पदप्रवणा[42] ॥ ५६ ॥
शिष्या मुर्ख विषादाहंकार कृतघ्न हे असे चवघे ॥
आत्मा यांसि न द्यावा या उपदेशामृतींच तूं चव घे ॥ ५७ ॥
पूज्य हि कोण स्वामी हें उपदेशा कृपा करूनि मला ॥
तो पूज्य वृत्त ज्याचें निर्मळ निष्काम तो प्रशांत भला ॥ ५८ ॥
कोण ह्मणावा अधम स्वामी सांगा करीन मी श्रवण ॥
जो सद्वृत्तापासुनि चळला त्याहूनि नीच तो कवण ॥ ५९ ॥
स्वामी पुरुषें कवणें न करुनि आयास जिंकिलें त्रिजगा ॥
सत्यक्षमागुणाढ्यें जग जिंकिलें तूं हि त्या गुणा भजगा ॥ ६० ॥
देवानीं ही कवणा [43]करिजे तें सुविनयें सदा नमना ॥
ज्याचें क्षण हि विसंबे भूतदया भगवती पदा न मन ॥ ६१ ॥
स्वामी कोणा पासुनि धरिजे उद्वेग बुद्धिमंतानें ॥
संसारवना पासुनि व्हावें उद्विग्न चित्त संतानें ॥ ६२ ॥
गुरुराया वश होतो कवणाला प्राणि गण जसा दास ॥
शिष्या सत्यप्रिय जो नित्य वदे त्या चि बहु विनीतांस[45] ॥ ६३ ॥
नित्य रहावें कोठें सांगा जी शिष्य मानसा धार्या[46] ॥
न्यायपथीं वस वत्सा दृष्टादृष्टार्थलाभ साधाया ॥ ६४ ॥
स्वामी काय असे हो चपळेच्या[47] विलसितां[48] परी चपळ ॥
खळसंगति [49]युवतिजन हि चपळ तयाला विलोकितां च पळ ॥६५॥
कंप नसे कुळशैला[50] कळिकाळीं ही तसा नसे कवणा ॥
शिष्या सत्पुरुष चि ते कलि भीतो ज्यांचिया गुणश्रवणा ॥ ६६ ॥

---

४० स्त्री. ४१. करुणारुपि आमृतानें द्रवत आहे हृदय ज्याचें. ४२ नम्र. ४३ केलें जातें. ४४ भूतदया-रूपी देवी. ४५ नम्र. ४६ तृप्त होण्या करितां. ४७ विजेच्या. ४८ लवणें. ४९ स्त्रीजन. ५० मुख्य पर्वत.

ज्ञाननिधे स्वामी मी शौच्य ह्मणावें कशास तें नेणें ॥
शिष्या ते कार्पण्यक्लेश चि लोकद्वयांत हा जेणें ॥ ६७ ॥
विभवीं काय श्लाघ्य स्वामी हें वांछितों कळायास ॥
हें हि वदा उपदेश प्रणतीं जो तो न निष्फळायास ॥ ६८ ॥
श्लाघ्य उदारपण चि बहुधनवंतास चि न अल्प धनिकां हीं ॥
तैसें चि सहिष्णुत्व[51] हि उचित समर्था तसें न जनिं कांहीं ॥ ६९ ॥
लोकीं चिंतामणिपरि दुर्लभ तें काय सांगिजे आतां ॥
कथिन चतुर्भद्र[52] तुला या अमृता पसरिला चि कीं आ तां[53] ॥७०॥
अज्ञानतिमिर[54]भास्कर ह्मणति चतुर्भद्र ज्यासि तें व्यक्त ॥
सांगोनियां करावा ज्ञानामृततृप्त आपुला भक्त ॥ ७१ ॥
प्रियभाषण सह दान ज्ञान हि गतगर्व वित्तसत्त्यागें[55] ॥
शौर्य क्षमासहित या पावे चहुं मंगळ महाभोगें[56] ॥ ७२ ॥
असि हे कंठीं ज्यांच्या प्रश्नोत्तर–रत्नमालिका विमळा ॥
इतर विभूषणरहित हि ते संत वसंत[57] बुधसभादि[58] मळीं[59] ॥७३॥
प्रश्नोतरमणिमाळा ज्याच्या कंठीं पडेल शोभेल ॥
त्याच्या गळां पडेल प्रेमें सत्कीर्ति मुक्ति लोभेल ॥ ७४ ॥
प्रश्नोत्तरमाणिमाळा रचिली श्रीशंकरें स्वयें अशि कीं ॥
कंठीं धरूनि व्हावें सत्कृतिला पात्र सज्जनीं रसिकीं ॥ ७५ ॥
जो धरिल प्रश्नोतर सन्मौक्तिकरत्नमालिका सारा ॥
भजतील सर्व त्याला हंस जसे मानसाख्य कांसारा ॥ ७६ ॥
ज्वरितासि शर्करा जसि कटु होय खळांसि सुरस ही कविता ॥
शिष्टां पद्मां सुख दे दुष्टा घूकांसि[61] ताप दे सविता ॥ ७७ ॥
संत मयुरेश्वरकृतकवनीं नवनीत कोमळी गोडी ॥
घेतील कीं तयाची करणें परगुणविवृद्धि ही जोडी ॥ ७८ ॥
या त्यार्या आर्यांनीं गाव्या ध्याव्या जशा सुधाधारा ॥
कीं अर्पिल्या मयुरें श्रीरामा राघवा बुधाधारा ॥ ७९ ॥

---

समाप्त.

---

५१ सहनशीलपणा. ५२ चार प्रकारचें कल्याण. ५३ त्वां. ५४ अंधकार. ५५ सत्कर्मी खर्च. ५६ दैववान. ५७ वसंत ऋतु. ५८ ज्ञानिसमूह. ५९ बाग. ६० सरोवर. ६१ घुबड.

अनुक्रमणिका

# श्रीगंगा-राजापुरस्थ-प्रतिनिधि-तीर्थ-कीर्तनं-

श्रीमद्भार्गवराम प्रभुवर शर[1]पात[2]जातसंत्रासें[3] ॥
सिंधु[4] सरे सह्या[5]सें त्यजुनि ग्रह जेंवि लब्ध[6]मंत्रास ॥ १ ॥
तें इषुपातक्षेत्रें[7] स्थल जें सोडूनि जाय अर्णव[8] तो ॥
त्या सुरतीर्थमयाचा महिमा लघुकविस काय वर्णवतो ॥ २ ॥
त्या सुक्षेत्रीं ह्मणती वृद्ध परमभक्त शूद्र तो भावें ॥
चिंती गंगेसि सुधारसपानें कां [नरें] न लोभावें ॥ ३ ॥
हा गंगे तुज अंतीं अंतरलों कीं असें दरिद्र वदे ॥
तो धांवा मातेच्या हृदया शिशुचा तयापरि द्रव दे ॥ ४ ॥
आली धांवुनि केलें जें गंगाद्वार तत्समान खेळें[9] ॥
पावावा या सुरभी[10]पासुनि सुजनें न वत्समान[11] खळें[12] ॥ ५ ॥
प्रकटे हरिचरणसुता[13] उन्मूळनि[14] क्षणांत मेढीतें[15] ॥
स्वतरंगां[16]हीं दावी माय भुजांहीं शिशूसि वेढीतें ॥ ६ ॥
श्रीगंगा मूर्त्तिमती होउनि कर्पूरजन्म कदलीतें ॥
हृदयांत लावाया ऐका सुरसिक तयासि वदली तें ॥ ७ ॥
बहु कारुण्यें द्रवल्यें देवूं बा काय वासरा[17] मागें ॥
बा माझा या हृदयीं केला न क्षणहि वास रामागें[18] ॥ ८ ॥
नमुनि भगवतीस ह्मणे हा माते श्यां बहु श्रमविलीस ॥
जे तूं श्रीजगदीशें निजशुद्ध जटांत कीं रमविलीस ॥ ९ ॥
या चरणदर्शनाहुनि मागावें अधिक तें दिसे न मला ॥
तुज तरि याहुनि बहुमत वर माते सांग कोण तो गमला ॥ १० ॥
तरि मावल्ये करावी धांवुनियां कलियुगीं अशीच दया ॥
हा दास दीन नेणे मागोंसें ह्मणसि बोल हूं वद या ॥ ११ ॥

---

१ शर = बाण. २ पात = पतन. ३ जातसंत्रास = प्राप्त झाली आहे भीति ज्यास असा ( हें सिंधूचें विशेषण ). ४ सिंधु = समुद्र. ५ सह्य = पर्वत विशेष. ६ लब्धमंत्र = मंत्री, पंचाक्षरी. ७ इषुपातक्षेत्र = कोंकण ( बाण पडून झालेलें क्षेत्र ). ८ अर्णव = समुद्र ९ धान्याची मळणी काढण्याचें ठिकाण. १० सुरभी = कामधेनु. ११ वत्समान = बाळकास प्राप्त होणारा मान. १२ खळें = दुष्टानें. १३ हरिचरणसुता = गंगा. १४ उन्मूळन = उपटून. १५ मेढ = खांब ( ज्यास बैल बांधितात ). १६ तरंग = लाट. १७ वासरा = हे वत्सा १८ रामाग = परशुरामाचा अपराध.

ते वत्सला[१९] ह्मणे बा भूतदया सुगुण हा न सामान्य ॥
हे नसती तरि कैसा होतासि यशें जगीं असा मान्य ॥१२॥
स्नानें करितिल माघापासुनि वैशाखमास पावेतों ॥
बा तें हें चातकशिशु आ करि जों मेघ त्यास पावे तों ॥१३॥
परि तुजसम जे दुर्बळ भोळे सद्भक्त तेचि तरतील ॥
स्पर्श न करितिल बालिश[२०] पाणी पाणी ह्मणोनि मरतील ॥१४॥
तुजकारितां प्रतिवर्षीं येइन जड निंदितील सोसीन ॥
मी शरण आलियांतें प्रक्षाळुनि सर्व पंक[२१] पोसीन ॥१५॥
ऐसें वदली गंगा क्षीरें[२२] न्हाणून वत्स तर्पून ॥
वाणीतें प्रभु रक्षिति अधनीं कन्येसि जेंवि अर्पून ॥१६॥
येथे अद्यापि श्रीगंगा राजापुराचिया जवळ ॥
कोंकण करिती विखरुनि शुद्धयशश्चंद्रचंद्रिका[२३] धवल[२४]॥१७॥
मज एकवेळ घडलें सत्संगतिनें अलभ्य मज्जन हो ॥
रचिलें सुतीर्थ कीर्तन हें फळ त्याचेंचि होय सज्जन हो ॥१८॥
या तीर्थकीर्तनाचा पडला त्या तीर्थ–कीर्तनें विसर ॥
नग[२५] लेउनि विसरावा मुक्तांचा सुगुणपूर्ण जेंवि सर[२६] ॥१९॥
गंगा ह्मणे अहा या माझी कैसी सुकीर्ति धवळील ॥
मद्रूप विसरला जें केवळ कारुण्य मूर्त जवळील ॥२०॥
हे लागलीच चिंता गंगेला ह्मणुनि मज दिलें स्मरण ॥
कीं गंगेचेंचि सुदृढ सर्व जनोत्धार सद्व्रताचरण ॥ २१ ॥
कडियेवरि नच घेतां स्तन्यामृत[२७] काय बाळ कवळील ॥
स्तवन असोचि गुरुदया नसतां जड पशुहि नीट न वळील ॥ २२ ॥
जें गंगेसि वहावें गंगाप्रभुच्या पदींच तें वाहें ॥
वाहे अन्या जैशा तैसी ऐशाहि रीतिनें वाहे ॥ २३ ॥
कीर्तनभक्ति इलुसि[२८] मज दाखउनि मनास लाविला चटका ॥
हा लाभ परि निजसुखानुभवावाचूनि ताविला चटका ॥ २४ ॥
गंगेला जायाला मज हतभाग्या न शक्ति न उपाय ॥
स्तुति सूचविली प्रभुचे देति प्रणतासि भक्ति नउ पाय ॥ २५ ॥

---

१९ वत्सला = दयाळु. २० बालिश = मूर्ख. २१ पंक = चिखल (पाप). २२ क्षीर = उदक. २३ चंद्रिका = चांदणें. २४ धवल = शुभ्र. २५ नग = दागिना. २६ सर = हार. २७ स्तन्य = दुग्ध २८ इलुसि = थोडीशी.

भक्तमयूरमनोनट नटतो सामान्य कीं बरा नटतो ॥
श्रीराम चि हें जाणें उरला व्यापूनि सर्व ही घट तो ॥ २६ ॥

इति श्रीरामनंदनमयूरविरचितं श्रीमद्गंगाप्रतिनिधितीर्थकीर्तनं संपूर्णम्.

## ॥ सन्मनोरथराजिः ॥

श्रीरामासि भजावें भक्तें म्यां जेंवि तेंवि संतातें ॥
राजासि उपासावें तैसें चि जनें प्रधानपंतातें[1] ॥ १ ॥
व्रतिबाळांचे कल्पुनि विधुचें रविचें जसें चिरागमन ॥
धरि उत्छव दिवसाचें बहु धरु माझें तसें चि राग[2] मन ॥ २ ॥
कर्णयुगांत भरावें हरिहरिजनें[3] यशः प्रचुर[4] म्यां तें ॥
जैसा दोंदीं[5] कोंदीं गुर्जरदेश विप्र चुरम्यातें[6] ॥ ३ ॥
हा हो सुतृप्त राघवनामें सारें चि जेंवि तेलिंगा ॥
शीला[7] जपो बहु जपाति जैसे अध्यात्म्य साधु ते लिंगा ॥ ४ ॥
म्यां लावावी हरिहरकीर्ति सुवीरें जसी सडक डावी ॥
गोवर्धनीं[8] घनघटा[9] तसि मजवरि अरिचंमूं[10] कडकडावी ॥ ५ ॥
मतिची पडो हरिगुणीं पतिकंठीं मिठि जसी सुदारांची ॥
नुच्चारू परमर्मा जीभ नकारा जसी उदारांची ॥ ६ ॥
सत्संगतीं असावा प्रेमा ग्रीष्मीं जसा असे व्यजनीं[11] ॥
रम्य हि अभक्त हो मन मधुपा चंपक तसा असेव्य-जनीं ॥ ७ ॥
स्त्रीस जसें न त्यजवे केलें उच्चिष्ट माजरें दुभतें ॥
सद्भजन दूषिलें जरि दुष्टें मद्बुद्धि न त्यजू शुभ तें ॥ ८ ॥
काव्य करावें म्यां न च वचकावें दूषिती परि लघूंस ॥
न करावें काय सदन कीं त्यांत पुढें बिळें करिल घूंस ॥ ९ ॥
हा सांजलि हो भजनीं योग्य मखीं युक्त कर सदर्भ कसा ॥
मद्ग्रंथ गुरुप्रिय हो अप्रौढ हि उक्तकर सदर्भकसा ॥ १० ॥

---

१ प्रधानपंत = पेशवा. २ राग = प्रीति. ३ हरिजन = भगवद्भक्त. ४ प्रचुर = पुष्कळ. ५ दोंद = पोट. ६ चुरमा = पक्वान्न विशेष. ७ शील = स्वभाव. ८ गोवर्धन = पर्वत विशेष. ९ घन-घटा = मेघ-समूह. १० अरि-चमू = शत्रु-सेना. ११ व्यजन = पंखा.

मातेतें त्यजुनि पळ हि जाय न भलतीकडे जसें बाळ ॥
सत्संगति सोडुनि मन न च जाउ तसें चि घेउ हें आळ ॥ ११ ॥
गुरुभक्ति ते स्वमाता भाऊ सत्संग विषय तो बाऊ ॥
भावूं[१२] माझें मानसबाळ श्रीरामकीर्तितें खाऊ ॥ १२ ॥
कांपावें मन कुजनीं वृद्धपणीं कांपतें जसें शिर तें ॥
सत्संगीं च शिरावें बाळ जनन्यंचळीं[१३] जसें शिरतें ॥ १३ ॥
मद्ग्रंथ असावा बुधजनबहुमत जेंवि शंभुवृषभांड[१४] ॥
अर्थें पूर्ण असो मम वच सत्पूजार्थ जेंवि वृषभांड ॥ १४ ॥
पूज्य असो मतिस तसा जन जैसा जड अशक्त जामाता[१५] ॥
सद्दृष्टि या जनीं अवलोकुनि लाजोत साधु ज्या माता ॥ १५ ॥
मज आपणांत मिळवुनि ध्यावें सुविशुद्धयशबुधानें तें ॥
तोयासि[१६] आत्मदानें जे अमृतभुगाननीं[१८] दुधा नेतें ॥ १६ ॥
नच सोडावें नारायणनामानें कदापि हें वदन ॥
मेल्या ही लोभाच्या चित्तें सोडूं नये जसें सदन ॥ १७ ॥
सद्भजन न त्यजावें बहुकष्टीं संकटीं जसें वतन ॥
सूक्त[१९] करावें तैसें जैसें तपकीर--तत्परें जतन ॥ १८ ॥
भाग्यवतीला दुर्बळकन्यासी तत्सभेसि हे उक्ति ॥
व्हावी परिपाल्या कीं घेती शिशुची हि जाणते युक्ति ॥१९॥
पांचांलिकाविवाहीं जैसें पिशुनीं तसें असो रुसणें ॥
समयींआपन्नजनीं द्यावें सुप्रिय जनीं जसें उसणें ॥ २० ॥
मन्माति सदुक्तिस भुलो त्या मुरलीला जसी च तीं राधा ॥
प्रभु मुनिसुतासि[२१] न ह्मणे काय अधिष्ठुनि पयोधितीरा धा[२२] ॥२१॥
प्रेमें नवीं नवीं तीं माझ्या रसनेसि[२३] सुकविकुलगीतें ॥
गीतें यावीं येती माहेरीं जेंवि बहुत मुलगीतें ॥२२॥
हो सत्कर प्रसादें कुब्जा तैसी मदीय मति सरळी ॥
खळकृतनिंदा सुखदा हो श्यालकृता[२४] जसी च मतिस रळी[२५] ॥२३॥
ज्या उक्तीतें समयीं अर्थी जाणोनि दान साधु करी ॥

---

१२ भावू = मानू. १३ जनन्यंचळ = आईच्या लुगड्याचा पदर. १४ शंभुवृषभांड = नंदीचा अंड. १५ जामाता = जांवाई. १६ तोय = उदक. १७ अमृतभुक् = देव. १८ आनन = मुख. १९ सूक्त = तपकीर ठेवण्या करितां कोंकणांत केळीचें वाळलेलें सोप घेतात तें. २० पांचालिका = भावली. २१ मुनिसुत = उपमन्यु. २२ धा = तृप्त हो. २३ रसना = जीभ. २४ शालकृता = मेव्हण्यानें केलेली. २५ रळी = थट्टा.

गोडीनें सेवावी ती म्यां क्षुभितें जशी च माधुकरी ॥२४॥
साध्वीशीनें न टळो द्यावा हा सुमतिनें जसा पदर ॥
सेवावें रसिकें वच याचें श्री राघवें जसें बदरें[२६] ॥२५॥
सद्दृष्टि आदरू मज वत्सा जसि गाय आदरि द्रवुनी ॥
हा आर्त म्हणो न पदीं हेमंतीं जेंवि हा दरिद्र उनीं ॥ २६ ॥
घोलूनि डोलवू हा डोलवितो जेंवि रसिक शिर कीरें[२७] ॥
मग चिंता काय जडा वाटो याची सदैव किरकीर ॥ २७ ॥
म्यां न च द्यावें म्हणतां धरूं वच मोडुनि नकोटरनगातें ॥
खग कनकपंजरा बहु मानी सोडुनि न कोटरें[२८]नगीतें[२९] ॥ २८ ॥
साध्वीला जें कांहीं कांत प्रिय तें चि कार्य होय जनीं ॥
स्वाहाधवांनभिमतीं[३०][३१] आग्रह काशास आर्य हो यजनीं[३२] ॥ २९ ॥
निश्चय करुनि न नागें तिळ ही ठेवी पतिव्रता चरण ॥
भगवद्भजनीं माझी तैसी च करू मति व्रताचरण ॥ ३० ॥
लागाव्या गोड तशा मद्धृदया ज्या परें दिल्या गाळी[३३] ॥
बाळें देतां हर्षे नसतां अठवूनि अश्रुतें गाळी ॥ ३१ ॥
हरिकीर्तिगीति जी म्यां दैवा व्हावें कुरंगें[३४] रे तींतें[३५] ॥
लोळावा हा सत्पदधूळींत जसा तुरंगें[३६] रेतींत ॥ ३२ ॥
बहु साधूक्त रुचावें लोभिप्रभुला जसें चहाडाचें ॥
मज अन्यकलत्राचें[३७] स्पर्श न विटवू जसें च हाडाचें ॥ ३३ ॥
वत्स जसा स्तन्यातें[३८] सादर पीतो धरूनि आम्यातें[३९] ॥
जें साधुमुखोद्गत यश तैसें प्यावें करूनि आ म्यां तें ॥ ३४ ॥
हरिकीर्तनीं शिरावें धनिकगृहीं जेंवि जपुनि चोरानें ॥
न उठावें बहुकार्यें बहु मारें जेंवि कुचर ढोरानें ॥ ३५ ॥
संसारदुःख विसरवु सत्पद्धति मतिस जेंवि काय घडी ॥
वरमायेसि विवाहीं विसरवि चवरी गुलाल पायघडी ॥ ३६ ॥
निजदेहगेहभान प्रभुभक्तांच्या कथीं हि मेळांत ॥
मज कीर्तनीं नसावें जैसें शिरतां मुलांस खेळांत ॥ ३७ ॥
म्यां कीर्तना टपावें मार्जारें सर्वदा जसें दुग्धा ॥

---

२६ बदर = बोर. २७ कीर = पोपट. २८ कोटर = घरटें. २९ नग = वृक्ष. ३० स्वाहाधव = स्वाहेचा पति = अग्नि. ३१ अनभिमत = अप्रिय. ३२ यजन = हवन. ३३ गाळी = शिव्या. ३४ कुरंग = हरिण. ३५ तींत = गीतींत. ३६ तुरग = घोडा. ३७ कलत्र = स्त्री. ३८ स्तन्य = दुग्ध. ३९ आमा = स्तन.

सन्मति विनयादिगुणां वाहो प्रेमें नगा जसी मुग्धीं[40] ॥ ३८ ॥
प्रिय हरिजन हो जैसा आला माहेरचा बहायाला ॥
स्त्रीजन जसा विवाहा जावें म्यां सज्जना पहायाला ॥ ३९ ॥
हृदय हरिजना कांता मतिनें उघडें करूनि ओपावें ॥
संद्विरहीं बहु देहीं गोपीचित्तें तसें चि कोपावें ॥ ४० ॥
हो नियति[41] बहु मता मम मतिस कुलवतीस जसि सदा श्वश्रू[42] ॥
स्पर्शावें गुरुजनपद शिरें असें गर्विजनकरें स्मश्रू[43] ॥ ४१ ॥
स्वप्रियलब्धरसकथन करिती स्वसखींजनीं जसी बाला ॥
प्रेमळ जनीं कथू निजसुख रसनें[44] स्तवुनि आपल्या भालीं[45] ॥ ४२ ॥
कीर्तन असो मतिस बहु मत जैसें स्त्रीस हळदकुंकु तरी ॥
स्वामि पुढें करु रसना चाटु पदीं पडुनि जेवि कुं कुतरी ॥ ४३ ॥
साधूक्ति बहु मता मज हो धनिक जनास जेवि यादवही ॥
कीं ज्यासि सुधा स्पर्शे त्या न विषाचा हि दे भया दवं[46] ही ॥ ४४ ॥
उलटा आंत स्पष्ट व्यवहारें देहांत दाखवी सुलटा ॥
सन्मति हो तैसी परपुरुषासक्ती[47] सदा जसी कुलटा[48] ॥ ४५ ॥
जैसें अंधे वृद्धें नसतां गतिहेतु हस्तकीं यष्टी ॥
तैसें व्हावें सज्जनसंगति वांचुनि उदंड म्यां कष्टी ॥ ४६ ॥
आवड असो कथेची जसि बाळा फाल्गुनांत पुनवेची ॥
संतीं वेंचावें धन तापसजन तप जसें *तपुनि वेंची ॥ ४७ ॥
मणिकनकभूषणाहुनि मुबहुमता स्त्रीजना गळसरीती ॥
हो तासि सदुक्ति या हा दावू एक चि जसा पळस रीती ॥ ४८ ॥
रंगावें सद्वचनें मतिनें चूर्णें[49] जसें चि हळदीनें ॥
भजन न सोडवें म्यां जेवि कधीं कर्षकें[50] न हळ[51] दीनें[52] ॥ ४९ ॥
द्यावा कार्मारंभीं नामातें जेवि मान वढिलातें ॥
जनमत चि करावें जें स्त्रीमत करि जेवि मानव ढिलीं[53] तें ॥ ५० ॥
हळु हळु झडो अहंता सन्मनीं बार्धकीं जशी शेंडी ॥
[54]केंडू विवेक विषया निस्पृह जन वस्तुतें जसा केंडी ॥ ५१ ॥

---

४० मुग्धा = स्त्री. ४१ नियति = नशीब. ४२ श्वश्रू = सासू. ४३ स्मश्रू = मिशी. ४४ रसना = जीभ. ४५ भाल = नशीब. ४६ दव = अग्नि. ४७ पर पुरुष = परकी पुरुष--पक्षीं पुरुषोत्तम ( विष्णु ). ४८ कुलटा = वेश्या. ४९ चूर्ण = चुना. ५० कर्षक = शेतकरी. ५१ हळ = नांगर. ५२ दीन = गरीब. ५३ ढिला = बाईल बुध्या. ५४ केंडू = टाकू.

* ' जपुनि ' पाठांतर.

